**गृह विभागाच्या पोलीस व तुरुंग या विभागामध्ये विविध आस्थापनांकरिता पायाभूत सुविधा पुरवणे, CCTV यंत्रणेसह इतर विविध तंत्रज्ञान विषयक प्रकल्प राबवणे तसेच वाहतूक व्यवस्थेचे बळकटीकरण करणे.**

# महाराष्ट्र शासन

# गृह विभाग

**शासन निर्णय क्र. दुरुस्ती-०११७/प्र.क्र.६९/भाग-२/पोल-७.**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०००३२.

दिनांक - २४ फेब्रुवारी, २०२२.

वाचा :-
१. शा.नि., नियोजन विभाग, क्र. जिवायो-१००७/प्र.क्र.३९/का.१४४४, दिनांक १६.०२.२००८.
२. शा.नि., गृह विभाग, क्र. सीसीटी-३६१५/ प्र.क्र.३६/ पोल-३, दिनांक ०९.०१.२०१७.
३. शा.नि., गृह विभाग, क्र. दुरुस्ती-०११७/ प्र.क्र.६९/ पोल-७, दिनांक २१.०९.२०१७.
४. शासन पूरकपत्र, गृह विभाग, क्र. दुरुस्ती-०११७/ प्र.क्र.६९/ पोल-७, दिनांक १६.०७.२०१९.

**प्रस्तावना.**

(१) पोलीस दलाच्या प्रशासकीय व निवासी इमारतींची दुरुस्ती व परिरक्षा, (२) सुरक्षा उपाय म्हणून राज्यात सार्वजनिक ठिकाणी *"Closed Circuit Television"* संनिरीक्षण *(surveillance)* यंत्रणा उभारणे व इतर उपयुक्त तंत्रज्ञान पुरविणे, (३) तुरुंगांची सुरक्षा व्यवस्था अधिक बळकट करणे, आणि (४) पोलीस रुग्णालय व पोलीस दवाखाने यांची दुरुस्ती व परिरक्षा या बाबींकरिता, "पोलीस व तुरुंग या विभागांच्या आस्थापनांमध्ये पायाभूत सुविधा पुरविणे आणि *"Closed Circuit Television"* संनिरीक्षण यंत्रणा व इतर उपयुक्त तंत्रज्ञान पुरविणे यांकरिता योजना," या नावाने जिल्हा वार्षिक योजनेखाली नियमित योजना सुरु करण्यास, शा.नि., गृह विभाग, क्र.दुरुस्ती-०११७/ प्र.क्र.६९/पोल-७, दिनांक २१.०९.२०१७, द्वारे मान्यता देण्यात आली होती.

२. उक्त बाबींकरिता जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) याखाली उपलब्ध निधीच्या कमाल १० टक्के रक्कम वापरण्यात यावी, असे उक्त शासन निर्णयात नमूद करण्यात आले होते.

३. त्यानंतर शासन पूरकपत्र, गृह विभाग, क्र. दुरुस्ती-०११७/ प्र.क्र.६९/ पोल-७, दिनांक १६.०७.२०१९, द्वारे,-

१. उक्त योजनेची व्याप्ती वाढवून त्यामध्ये *"पोलीस दलाचे आधुनिकीकरण करणे,"* आणि *"राज्यातील प्रत्येक पोलीस ठाण्याच्या अंतर्गत आपले पोलीस ही संकल्पना अंमलात आणण्याकरिता वाहतूक व्यवस्थेचे बळकटीकरण करणे, दुचाकी व चारचाकी वाहने, यारी (Crane) व इतर आवश्यक सामग्री खरेदी करणे,"* या दोन नवीन बाबींचा समावेश करण्यात आला.

२. तसेच, त्या अनुषंगाने उक्त योजनेचे नाव *"पोलीस व तुरंग या विभागांच्या आस्थापनांमध्ये पायाभूत सुविधा पुरविणे, "Closed Circuit Television" संनिरीक्षण यंत्रणा व इतर उपयुक्त तंत्रज्ञान पुरविणे, पोलीस दलाचे आधुनिकीकरण करणे आणि "आपले पोलीस" संकल्पना अंमलात आणण्याकरिता वाहने खरेदी करणे, यांकरिता योजना,"* असे सुधारित करण्यात आले.

४. उक्त योजनेखाली करावयाची कामे, त्यांचे स्वरुप व त्यांना प्रशासकीय मान्यता देणारे प्राधिकरण व अंमलबजावणी यंत्रणा विनिर्दिष्ट करणे, या योजनेकरिता जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) याखाली उपलब्ध करुन द्यावयाचा निधी निश्चित करणे आणि उक्त योजना अधिक स्पष्ट व नेमकी करणे या दृष्टीने उक्त योजना सुधारित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय. :-**

शा.नि., गृह विभाग, क्र. दुरुस्ती-०११७/ प्र.क्र.६९/ पोल-७, दिनांक २१.०९.२०१७ व शासन पूरकपत्र, गृह विभाग, क्र. दुरुस्ती-०११७/ प्र.क्र.६९/ पोल-७, दिनांक १६.०७.२०१९, अधिक्रमित करुन, पोलीस दलाच्या प्रशासकीय व निवासी इमारतींची दुरुस्ती, पोलीस रुग्णालये व पोलीस दवाखाने यांची दुरुस्ती, वाहतूक व्यवस्थेचे बळकटीकरण करणे, तुरुंगाच्या इमारतींची दुरुस्ती करणे, राज्यात सार्वजनिक ठिकाणी Closed Circit Television संनिरीक्षण यंत्रणा उभारणी व इतर उपयुक्त तंत्रज्ञान पुरविणे, पोलीस दलाचे आधुनिकीकरण करणे आणि आपले पोलीस संकल्पना अंमलात आणण्याकरीता वाहने खरेदी करणे, तंत्रज्ञान विषयक प्रकल्प राबविणे, सीसीटीव्ही दुरुस्ती व देखभाल, पोलीस दलाच्या प्रशासकीय व निवासी इमारतींची नविन बांधकामे, पोलीस रुग्णालये व पोलीस दवाखाने यांची नविन बांधकामे, तुरुंगाची सुरक्षाव्यवस्था बळकटीकरण करणे व पायाभूत सुविधा पुरविणे  या बाबींकरिता, "जिल्हा वार्षिक सर्वसाधारण योजनांतर्गत गृह विभागाच्या पोलीस व तुरुंग या विभागामध्ये विविध आस्थापनांकरीता पायाभूत सुविधा पुरविणे, CCTV यंत्रणेसह विविध तंत्रज्ञानविषयक प्रकल्प राबविणे तसेच वाहतूक व्यवस्थेचे बळकटीकरण करणे," या नावाने जिल्हा वार्षिक योजनेखाली नियमित योजना सुरु करण्यास या सोबतच्या जोडपत्रात निर्दिष्ट केल्याप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे.

२. उक्त योजनेस "गृह विभागाच्या विवक्षित प्रयोजनांसाठी योजना" असे म्हणावे.

३. उक्त योजनेखाली कामांना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याचे अधिकार हे जिल्हाधिकारी-नि-सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, यांना राहतील.

४. उक्त योजनेखाली कामांना तांत्रिक मान्यता प्रदान करण्याचे अधिकार हे यासोबतच्या जोडपत्रात निर्दिष्ट केल्याप्रमाणे राहतील.

५. केंद्र योजना किंवा राज्य योजना याखाली मंजूर करण्यात आलेली कामे उक्त योजनेखाली करता येणार नाहीत. त्याचप्रमाणे उक्त योजनेखाली मंजूर करण्यात आलेली कामे ही केंद्र योजना किंवा राज्य योजना याखाली करता येणार नाहीत.

६. उक्त योजनेकरिता जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) याखालील तीन टक्के इतका निधी सन २०२२-२०२३ या वित्तीय वर्षांपासून पुढील पाच वित्तीय वर्षांमध्ये उपलब्ध करण्यात येईल.

७. उक्त योजनेकरिता प्रत्येक जिल्हा नियोजन समितीच्या बाबतीत वेगवेगळी लेखाशीर्ष निर्माण करण्यात येत आहेत.

८. ही योजना सन २०२२-२३ या वित्तीय वर्षपासून पुढील पाच वर्ष अंमलात राहील.

९. हा शासन निर्णय नियोजन विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र. ४/का.१४८१, दिनांक २७.०१.२०२२ आणि वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.५८६/व्यय-७, दिनांक २०.०१.२०२२, यांच्या अन्वये मिळालेल्या अनुक्रमे व त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

१०. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०२२५१२०११९२०२९ असा आहे. हा शासन निर्णय डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NARAYAN BIRA MANE

Digitally signed by NARAYAN BIRA MANE
DN: CN = NARAYAN BIRA MANE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = ï¿¿HOME DEPARTMENT
Date: 2022.02.25 12:04:09 +05'30'

**(नारायण बि. माने)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/ विधानपरिषद, यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
५. मा.राज्यमंत्री, गृह (शहरे) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.राज्यमंत्री, गृह (ग्रामीण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
९. सर्व विभागीय आयुक्त.
१०. सर्व जिल्हाधिकारी.
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१२. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१३. संचालक, लेखा व कोषागारे, म.रा., मुंबई.
१४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१५. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
१६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
१७. कार्यासन अधिकारी (तुरुंग-२/ पोल-३/ पोल-४/ अर्थसं-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

१८. कार्यासन अधिकारी (कार्यासन-१४८१), नियोजन विभाग. मंत्रालय, मुंबई.
१९. कार्यासन अधिकारी (व्यय-७/ विनियम), वित्त विभाग. मंत्रालय, मुंबई.
२०. निवड फाईल, पोल-७.

# जोडपत्र

(शा.नि.गृह विभाग. क्र. दुरुस्ती-०११७/प्र.६९(भाग-२) चे जोडपत्र)

गृह विभागाच्या विवक्षीत प्रयोजनासाठी योजना

| अ.क्र. | योजनेतील बाब | |
|---|---|---|
| १. | पोलीस दलाच्या प्रशासकीय व निवासी इमारतींची दुरुस्ती | |
| | कामे | पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, व पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या आस्थापनेवरील पोलीस दलाच्या प्रशासकीय व निवासी इमारतींची दुरुस्तीची कामे करणे. |
| | कामाचे स्वरुप | स्थापत्य व विद्युतविषयक कामे |
| | अंमलबजावणी यंत्रणा | जिल्हा पोलीस अधिक्षक किंवा यथास्थीती पोलीस आयुक्त, आणि सार्वजनिक बांधकाम विभाग |
| | तांत्रिक मान्यता | सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत प्रचलीत स्थायी आदेशानुसार सक्षम प्राधिकारी |
| २. | पोलीस रुग्णालये व पोलीस दवाखाने यांची दुरुस्ती | |
| | कामे | पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, व पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या आस्थापनेवरील पोलीस रुग्णालये व पोलीस दवाखाने इमारतींची दुरुस्तीची कामे करणे. |
| | कामाचे स्वरुप | स्थापत्य व विद्युतविषयक कामे |
| | अंमलबजावणी यंत्रणा | जिल्हा पोलीस अधिक्षक किंवा यथास्थीती पोलीस आयुक्त, आणि सार्वजनिक बांधकाम विभाग |
| | तांत्रिक मान्यता | सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत प्रचलीत स्थायी आदेशानुसार सक्षम प्राधिकारी |
| ३. | वाहतूक व्यवस्थेचे बळकटीकरण करणे | |
| | कामे | दुचाकी व चारचाकी वाहने, यारी (Crane) खरेदी करणे. |
| | कामाचे स्वरुप | मोटार वाहन खरेदी |
| | अंमलबजावणी यंत्रणा | जिल्हा पोलीस अधिक्षक किंवा यथास्थीती पोलीस आयुक्त, |
| | तांत्रिक मान्यता | पोलीस महासंचालक |
| ४. | तुरुंगाच्या इमारतींची दुरुस्ती करणे | |
| | कामे | तुरुगांच्या इमारतींची दुरुस्तीची कामे करणे. |
| | कामाचे स्वरुप | स्थापत्य व विद्युतविषयक कामे |

| | | |
|---|---|---|
| | अंमलबजावणी यंत्रणा | अधिक्षक, जिल्हा कारागृह आणि सार्वजनिक बांधकाम विभाग |
| | तांत्रिक मान्यता | सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत प्रचलीत स्थायी आदेशानुसार सक्षम प्राधिकारी |
| ५ | राज्यात सार्वजनिक ठिकाणी Closed Circuit Television संनिरीक्षण यंत्रणा उभारणी व इतर उपयुक्त तंत्रज्ञान पुरविणे | |
| | कामे | Closed Circuit Television संनिरीक्षण यंत्रणा उभारणी व इतर तांत्रिक कामे. |
| | कामाचे स्वरुप | यंत्रसामुग्री व साधनसामुग्री |
| | अंमलबजावणी यंत्रणा | जिल्हा पोलीस अधिक्षक किंवा यथास्थिती पोलीस आयुक्त, |
| | तांत्रिक मान्यता | सामान्य प्रशासन विभाग, माहिती तंत्रज्ञान उपविभाग महाराष्ट्र शासन. |
| ६ | पोलीस दलाचे आधुनिकीकरण करणे आणि आपले पोलीस संकल्पना अंमलात आणण्याकरीता वाहने खरेदी करणे | |
| | कामे | दुचाकी व चारचाकी वाहने खरेदी करणे, शस्त्रे व दारुगोळा खरेदी, यंत्रसामुग्री व साधनसामग्री खरेदी. |
| | कामाचे स्वरुप | मोटार वाहन खरेदी, शस्त्रे व दारुगोळा खरेदी, यंत्रसामुग्री व साधनसामग्री खरेदी. |
| | अंमलबजावणी यंत्रणा | जिल्हा पोलीस अधिक्षक किंवा यथास्थीती पोलीस आयुक्त, |
| | तांत्रिक मान्यता | पोलीस महासंचालक |
| ७. | तंत्रज्ञान विषयक प्रकल्प, | |
| | कामे | नविन तंत्रज्ञानाचा वापर दैनंदिन कामासाठी करण्यासाठी नवनविन तंत्रज्ञानाचा उपयोग करणे |
| | कामाचे स्वरुप | तंत्रज्ञान विषयक प्रकल्प राबविणे |
| | अंमलबजावणी यंत्रणा | जिल्हा पोलीस अधिक्षक किंवा यथास्थीती पोलीस आयुक्त, |
| | तांत्रिक मान्यता | गृह विभाग |
| ८. | सीसीटीव्ही दुरुस्ती व देखभाल, | |
| | कामे | Closed Circuit Television संनिरीक्षण यंत्रणा दुरुस्ती व अनुषांगिक तांत्रिक कामे. |
| | कामाचे स्वरुप | यंत्रसामुग्री व साधनसामुग्री |
| | अंमलबजावणी यंत्रणा | जिल्हा पोलीस अधिक्षक किंवा यथास्थीती पोलीस आयुक्त, |
| | तांत्रिक मान्यता | सामान्य प्रशासन विभाग, (माहिती तंत्रज्ञान उपविभाग) महाराष्ट्र शासन. |
| ९. | पोलीस दलाच्या प्रशासकीय व निवासी इमारतींची नविन बांधकामे, | |
| | कामे | पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, व पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या आस्थापनेवरील पोलीस दलाच्या प्रशासकीय व निवासी इमारतींची नविन बांधकामे करणे. |
| | कामाचे स्वरुप | स्थापत्य व विद्युतविषयक कामे |

| | | |
|---|---|---|
| | अंमलबजावणी यंत्रणा | जिल्हा पोलीस अधिक्षक किंवा यथास्थीती पोलीस आयुक्त, आणि सार्वजनिक बांधकाम विभाग /महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ |
| | तांत्रिक मान्यता | महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ / सार्वजनिक बांधकाम विभाग |
| १० | पोलीस रुग्णालये व पोलीस दवाखाने यांची नविन बांधकामे, | |
| | कामे | पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, व पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या आस्थापनेवरील पोलीस रुग्णालयाच्या प्रशासकीय व निवासी इमारतींची नविन बांधकामे करणे. |
| | कामाचे स्वरुप | स्थापत्य व विद्युतविषयक कामे |
| | अंमलबजावणी यंत्रणा | जिल्हा पोलीस अधिक्षक किंवा यथास्थीती पोलीस आयुक्त, आणि सार्वजनिक बांधकाम विभाग / महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ |
| | तांत्रिक मान्यता | महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ / सार्वजनिक बांधकाम विभाग |
| ११ | तुरुंगाची सुरक्षाव्यवस्था बळकटीकरण करणे व पायाभूत सुविधा पुरविणे | |
| | कामे | तुरुंगाची सुरक्षाव्यवस्था बळकटीकरण करणे व पायाभूत सुविधा पुरविणे |
| | कामाचे स्वरुप | तुरुंगाची सुरक्षाव्यवस्था बळकटीकरण करणे व पायाभूत सुविधा पुरविणे |
| | अंमलबजावणी यंत्रणा | अधिक्षक, जिल्हा कारागृह आणि सार्वजनिक बांधकाम विभाग / महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ |
| | तांत्रिक मान्यता | सार्वजनिक बांधकाम विभाग / महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ |

NARAYAN BIRA MANE

Digitally signed by NARAYAN BIRA MANE
DN: CN = NARAYAN BIRA MANE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = ï¿¿HOME DEPARTMENT
Date: 2022.02.25 12:04:29 +05'30'

**(नारायण बि.माने)**

**कार्यासन अधिकारी, गृह विभाग**